**प्रशासकीय मान्यता**

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात जिल्हा वार्षिक योजनांतर्गत मंजूर अनुदानातून संस्थेकरिता यंत्र खरेदीस प्रशासकीय मान्यता.

छत्रपती प्रमिलाराजे सर्वोपचार रुग्णालय, कोल्हापूर

**महाराष्ट्र शासन**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**

**शासन निर्णय, क्रमांक : सीएचके-२०१९/प्र.क्र.२१/प्रशा-१**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,

दिनांक : १८ जानेवारी, २०१९.

**वाचा :**
1. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.
2. शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.
3. शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक ०७.०३.२०१८.
4. संचालक वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र : संवैशिवसं/छप्रासरुको/जिनिस-यंसाख/३-म/६४१/१९, दिनांक : ११.०१.२०१९.
5. जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, कोल्हापूर यांचे पत्र क्र. नियोजन-का-१८/जिवायो प्रमा/४०/२०१८-१९, दिनांक ०७.०१.२०१९.

**शासन निर्णय :-**

छत्रपती प्रमिलाराजे सर्वोपचार रुग्णालय, कोल्हापूर या संस्थेस सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात जिल्हा नियोजन समितीमार्फत जिल्हा वार्षिक योजनांतर्गत यंत्रसामुग्री खरेदी करण्यासाठी रुपये ४००.०० लक्ष इतके अनुदान मंजूर करण्यात आलेले आहे. सदर अनुदानातून एकूण रुपये २,९९,८९,०७५/- (अक्षरी रुपये दोन कोटी नव्याण्णव लक्ष एकोणनव्वद हजार पंचाहत्तर फक्त) इतक्या रकमेची खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे यंत्रसामुग्री खरेदी करण्यास या शासननिर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | यंत्राचे नांव | नग | प्रती नग किंमत | एकूण किंमत | प्रशासकीय मान्यतेची रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १. | अल्ट्रा सोनोग्राफी मशिन | २ | ५५,००,००० | १,१०,००,००० | १,१०,००,००० |
| २. | व्हेंटीलेटर | ५ | ८,५६,८०० | ४२,८४,००० | ४२,८४,००० |
| ३. | न्युरो सर्जिकल ऑपरेटींग मायक्रो स्कोप | १ | ३८,००,००० | ३८,००,००० | ३८,००,००० |
| ४. | लॅप्रोस्कोपीक ॲन्ड हिस्क्ट्रोस्कोपीक सेट | १ | २४,१३,६०० | २४,१३,६०० | २४,१३,६०० |
| ५. | ॲनेस्थेशिया वर्क स्टेशन लो एंड | १ | १९,४०,५१० | १९,४०,५१० | १९,४०,५१० |
| ६. | मल्टीपॅरा मॉनिटर विथ ई.टी.सी.ओ.२ | ५ | १,९९,९२० | ९,९९,६०० | ९,९९,६०० |
| ७. | सर्जिकल कॉटरी | २ | ४,५२,५०३ | ९,०५,००६ | ९,०५,००६ |
| ८. | सिरीज पंप | २० | ३९,२०० | ७,८४,००० | ७,८४,००० |
| ९. | ॲनेस्थेशिया मशिन | १ | ६,१६,००० | ६,१६,००० | ६,१६,००० |
| १०. | डिफीब्रीलेटर | २ | २,९०,००० | ५,८०,००० | ५,८०,००० |
| ११. | ए.बी.जी.मशिन | १ | ५,०४,९०० | ५,०४,९०० | ५,०४,९०० |
| १२. | लॅमिनार एअर फलो | २ | १,९३,८०३ | ३,८७,६०६ | ३,८७,६०६ |
| १३. | ऑप्थॅल्मीक ओ.टी.टेबल विथ सर्जन्स चेअर | ३ | ९७,९४० | २,९३,८२० | २,९३,८२० |
| १४. | सेंट्रल सक्शन फॉर एन.आय.सी.यु. | १ | २,९२,८४५ | २,९२,८४५ | २,९२,८४५ |
| १५. | सिरीज पंप | ५ | ३८,०८० | १,९०,४०० | १,९०,४०० |
| १६. | नॉन इन्व्हाजीव व्हेंटीलेटर पोर्टेबल | २ | ८४,००० | १,६८,००० | १,६८,००० |
| १७. | फुल्ली ॲटोमेटीक व्हर्टीकल ॲटोक्लेव्ह | १ | १,५०,००० | १,५०,००० | १,५०,००० |
| १८. | सेंट्रीफयुज डिजीटल | २ | ७०,८०० | १,४१,६०० | १,४१,६०० |
| १९. | इन्क्युबेटर | २ | ४९,५६० | ९९,१२० | ९९,१२० |
| २०. | मायेक्रोकंट्रोलर बेस्ड टॉर्निक्वेट | १ | ८५,१२० | ८५,१२० | ८५,१२० |
| २१. | ॲटोक्लेव्ह व्हर्टीकल | १ | ८१,४२० | ८१,४२० | ८१,४२० |
| २२. | सेंट्रीफयुज | २ | ३५,९९० | ७१,९८० | ७१,९८० |
| २३. | हॉट एअर ओव्हन | १ | ६१,३६० | ६१,३६० | ६१,३६० |

| अ. क्र. | यंत्राचे नांव | नग | प्रती नग किंमत | एकूण किंमत | प्रशासकीय मान्यतेची रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| २४. | रेफ्रीजरेटर ४०० लि. | १ | ५५,९६८ | ५५,९६८ | ५५,९६८ |
| २५. | फोटोइलेक्ट्रीक कलरीमिटर | २ | १६,५०० | ३३,००० | ३३,००० |
| २६. | व्होर्टेक्स मिक्सर | २ | १४,३०६ | २८,६१२ | २८,६१२ |
| २७. | सक्शन मशिन | १ | २०,६०८ | २०,६०८ | २०,६०८ |
| | **एकूण** | | | **२,९९,८९,०७५** | **२,९९,८९,०७५** |

**अटी :-**

१. सदर प्रशासकीय मान्यता जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, कोल्हापूर यांच्यामार्फत जिल्हा वार्षिक योजनांतर्गत सदर संस्थेस मंजूर असलेल्या अनुदानातून प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर यंत्रसामुग्री हाताळणीसाठी नव्याने पदनिर्मितीची आवश्यकता नाही, याबाबत संचालनालयाने व संबंधित अधिष्ठाता यांनी खातरजमा करावी.

३. सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ मध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

४. सदर यंत्रसामुग्री खरेदी विषयक प्रक्रिया "औषधे, तद्अनुषंगीक उपभोग्य वस्तू व वैद्यकीय उपकरणे या बाबींची खरेदी हाफकिन बायो-फामास्युटीकल्स कॉपोरेशन लि. मार्फत करण्याबाबत" निर्गमित शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ नुसार करावी.

५. सदर यंत्रसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री संचालक (वै.शि.) तसेच संबंधित अधिष्ठाता यांनी करावी.

६. सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार यंत्रपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे संचालक (वै.शि.) यांनी प्रमाणित करावे.

७. प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भुत केलेला नसल्याबाबत व सदर यंत्रसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत संचालकांनी खात्री करावी.

८. मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

९. सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली मंजुर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०. उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे राज्यस्तरीय खरेदी समितीने अनुपालन करावे. सदर तरतूदीचे अनुपालन केलेल्या यंत्राच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

२. या प्रयोजनासाठी उपरोक्त तक्यात नमूद केल्यानुसार येणारा यंत्रनिहाय खर्च सदर संस्थेस सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात जिल्हा वार्षिक योजनांतर्गत मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा व त्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

छत्रपती प्रमिलाराजे सर्वोपचार रुग्णालय, कोल्हापूर
मागणी क्रमांक - ओ - ३५

४५१५ - इतर ग्रामविकास कार्यक्रम यावरील भांडवली खर्च
००, ८०० - इतर खर्च
(४१) - जिल्हा योजना - कोल्हापूर
(४१) (०१) - इतर जिल्हा योजना (कार्यक्रम)
(४५१५ ०७९२)
५२ - यंत्रसामुग्री व साधनसामग्री

३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०११८१६१३१९८०१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun M. Dahale

Digitally signed by Arun M. Dahale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education and Drugs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, cn=Arun M. Dahale
Date: 2019.01.18 16:46:08 +05'30'

( अ. मु. डहाळे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखाकार - १ ( लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई.
२. व्यवस्थापकीय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉपोरेशन लि., मुंबई.
३. जिल्हाधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, कोल्हापूर.
४. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
५. अधिष्ठाता, छत्रपती प्रमिलाराजे सर्वोपचार रुग्णालय, कोल्हापूर.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर.
७. निवडनस्ती (प्रशा-१).